**जिल्हा परिषद निवृत्तीवेतनधारकांना निवृत्तीवेतन प्रदान करण्याच्या पध्दतीबाबत.**

महाराष्ट्र शासन
**ग्रामविकास व जलसंधारण विभाग**
शासन परिपत्रक क्र.सेनिवे-४१११/प्र.क्र.१६८/आस्था-११
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २० सप्टेंबर, २०११.

**परिपत्रक**

जिल्हा परिषदा या स्वायत्त संस्था आहेत. जिल्हा परिषद कर्मचा-यांना जरी महाराष्ट्र नागरी सेवा नियमांचे लाभ देण्यात येत असले तरी ते शासकीय कर्मचारी नाहीत. जिल्हा परिषद कर्मचा-यांना वेतनादि लाभ हे जिल्हा परिषदा अदा करतात. राज्य शासकीय कर्मचा-यांच्या निवृत्ती वेतनास अंतिम मंजूरी महालेखापालांकडून देण्यात येते व निवृत्ती वेतन धारकाचे खाते महालेखापालांकडे असते. तथापि जिल्हा परिषद कर्मचा-यांची निवृत्ती वेतनाची अंतिम मंजूरी संबंधित जिल्हा परिषदेतील मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचे मार्फत देण्यात येते व त्यांचे निवृत्ती वेतनाचे खाते जिल्हा परिषदेकडेच ठेवण्यात येते.

जिल्हा परिषदेतील निवृत्तीवेतनधारक हे राज्य शासनाचे निवृत्तीवेतनधारक नसल्याने तसेच त्यांचे निवृत्तीवेतन महालेखापाल यांचेकडून प्राधिकृत होत नसल्याने व ते महालेखापाल यांचेमार्फत नियंत्रित करणे शक्य नसल्याने जिल्हा परिषद निवृत्तीवेतनधारकांना प्रचलित व्यवस्थेनुसार दुस-या राज्यातून निवृत्तीवेतन प्रदान करता येणार नाही. या संदर्भात महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील निवृत्तीवेतन विषयक तरतूदी जिल्हा परिषदेतील निवृत्तीवेतनधारकांना लागू नाहीत, ही बाब स्पष्ट करण्यात येत असून ती सेवानिवृत्त होऊन अन्य राज्यात स्थायी होणा-या जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या निदर्शनास आणण्यात यावी.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०११०९१३१५३६३१००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(प्रकाश हिर्लेकर)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सर्व विभागीय आयुक्त
२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
३. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी
४. सर्व कार्यासने, ग्रामविकास व जलसंधारण विभाग
५. निवडनस्ती-आस्था-११.